**राज्यात "रस्ता सुरक्षा अभियान" राबविण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक : एमव्हिआर—१२११/प्र.क्र.९३२/परि—२,
मंत्रालय, मुंबई—४०० ०३२.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०११.

**शासन परिपत्रक :—**

केंद्र शासनाच्या रस्ता वाहतूक व महामार्ग मंत्रालयाच्या मार्गदर्शक सुचनानुसार देशातील सर्व राज्यांमध्ये दिनांक १ जानेवारी, २०१२ ते दिनांक ७ जानेवारी, २०१२ या कालावधीत खालील नमुद बाबींच्या संदर्भात "रस्ता सुरक्षा सप्ताह" पाळण्याबाबत निदेशित केले आहे. त्या अनुषंगाने राज्य शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार **दिनांक १ जानेवारी, २०१२ ते दिनांक १५ जानेवारी, २०१२** या पंधरवाडयात **रस्ता सुरक्षा अभियान** सर्व राज्यभर राबविण्यात यावावयाचे आहे.

अ) **सार्वजनिक वाहतुक व्यवस्था.**
बस मार्गिका सुधारणा, सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेचे सुसूत्रीकरण, जड वाहनचालक यांच्याकरिता रस्ता सुरक्षा संदर्भात तज्ञांकडून मार्गदर्शनपर व्याख्यानाचे आयोजन करणे इत्यादी कामे नगरपालिका, महानगरपालिका व परिवहन विभाग यांनी राबविण्याचे आहेत.

ब) **वाहतूक व्यवस्थापन.**
वाहतूक सिग्नल्समध्ये समन्वय ठेवणे, मोठया चौकातील वाहतुकीचे योग्य प्रकारे नियमन करणे, माल वाहतूक करणाऱ्या वाहनांचे दिवसा गर्दीच्या ठिकाणी योग्य नियमन करणे, धोकादायक पदार्थांची वाहतुक करणाऱ्या वाहनांची तपासणी करणे इत्यादी कामे महानगरपालिका, नगरपालिका, परिवहन विभाग व वाहतुक विभाग यांनी राबविण्याचे आहेत.

क) **रस्त्याच्या पायाभूत सुविधा.**
ठराविक कालावधीने रस्त्याची देखभाल करणे, अधिक गतीने/कमी गतीने जाणाऱ्या वाहनांसाठी स्वतंत्र मार्गिका करणे इत्यादी कामे सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी राबविण्याचे आहेत.

ड) **वाहन प्रदुषणाबाबत.**
वाहन प्रदुषण तपासणी केंद्राचे परिक्षण करणे, वाहनांची योग्यता प्रमाणपत्रासाठी काटेकोरपणे तपासणी करणे इत्यादी कामे परिवहन विभाग यांनी राबविण्याचे आहेत.

इ) जनजागृती.

मा. मुख्यमंत्री महोदयांचा रस्ता सुरक्षा विषयक संदेश जनतेपर्यंत पोहचविणे, विविध चर्चासत्रांचे आयोजन करणे, रस्ता सुरक्षेसंबंधी माहिती पुस्तिका तयार करून त्याचे वाटप करणे, सुरक्षित वाहतूकबाबतची माहिती बॅनर्सद्वारे प्रदर्शित करणे, स्टिकर्स तयार करून वाहन धारकांना स्टिकर्सचे वाटप करणे, शाळा/कॉलेज विद्यार्थ्यांसाठी चित्रकला स्पर्धा, निबंध स्पर्धा, वादविवाद स्पर्धा, रस्ता सुरक्षा या विषयावर प्रदर्शचनाचे कार्यक्रम आयोजीत करणे. एनएसएस/एनसीसीच्या माध्यमातुन महाविद्यालयीन स्तरावर विद्यार्थ्यांमध्ये रस्ता सुरक्षे विषयी मोठया प्रमाणात जनजागृती करणे. वाहतुक नियमनासाठी प्रशिक्षण/चर्चासत्रे आयोजित करणे, फोटो/पेंटीग्जचे खुले प्रदर्शन आयोजित करणे, इत्यादी कामे शिक्षण विभाग, परिवहन विभाग व पोलीस विभाग यांनी राबविण्याचे आहेत.

२. जनसामान्यांच्या मनात रस्ता सुरक्षा संदर्भातील गांभीर्यपुर्वक जागृती निर्माण करण्यासाठी "रस्ता सुरक्षा अभियानातंर्गत" सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे ठरविलेल्या कृती कार्यक्रमाच्या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे अंमलबजावणी संबंधित विभागांच्या खाते प्रमुखांनी करावी.

३. महाराष्ट्र शासन, गृहविभाग मंत्रालय मुंबई दि. ११/१०/२०११, राजपत्र असाधारण भाग चार—अ, ऑक्टोबर १३, २०११ याद्वारे राज्य रस्ता सुरक्षा परिषद आणि प्रत्येक जिल्हयांसाठी जिल्हा रस्ते सुरक्षा समिती गठीत करण्यात आलेल्या आहेत.

रस्ता सुरक्षा अभियान—२०१२ हे उपरोक्त समितींच्या देखरेखीखाली जिल्हा स्तरावर आयोजित करणे गरजेचे आहे.

४. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई व अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी समन्वयक म्हणून कार्यवाही करावयाची असून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भि. रा. वाढवे )
शासनाचे सह सचिव

प्रती,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
अपर मुख्य सचिव (गृह),
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,
प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग,
सचिव (अ व सु), गृह विभाग,
सचिव (परिवहन), गृह विभाग,
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय,
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,
सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय,
सचिव, वैद्यकिय शिक्षण,
अपर पोलीस महासंचालक (वाहतूक),
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई परिवहन उपक्रम, मुंबई,
उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
शिक्षण संचालक, (प्राथमिक व माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त,
सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,
सर्व विभागीय नियंत्रक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,
सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी,
सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,
सर्व उप आयुक्त, महानगरपालिका/मुख्याधिकारी, नगर पालिका/परिषद.

# परिशिष्ट

## महाराष्ट्र राज्य रस्ता सुरक्षा अभियान दरम्यान

## दि.०१/०१/२०१२ ते दि.१५/०१/२०१२ रोजी पर्यंत करावयाचे कार्यक्रमाची रूपरेषा.

| अ.क्र | दिनांक | कार्यक्रम | आंमत्रीत मान्यवर | अंमलबजावणी/सहभाग |
|---|---|---|---|---|
| १ | १/१/२०१२ | **अ)** १) राज्य रस्ता सुरक्षा अभियानाचे उद्घाटन.<br>२) टोलनाका व महत्वाच्या रहदारीच्या ठिकाणी चालक/प्रवाशयांच्या जागृतीसाठी माहिती पत्रकाचे वाटप करणे.<br>३) महत्वाच्या ठिकाणी जनजागृतीचे पोस्टर्स चिटकविणे.<br>४) माहिती पुस्तिकेचे वाटप करणे.<br>५) वेबसाईटची माहिती देणे.<br>......<br>**ब) विशेष मोहिम -** ड्रंकनड्राईव्ह/ओव्हरस्पीड | १)मा.मंत्री/आमदार/ मान्यवर<br>२) वाहन चालक, टॅक्सी संघटना, ॲटोरिक्षा संघटना पदाधिकारी<br>३) वृत्तपत्र, आकाशवाणी, दुरचित्र वाहिनीचे पत्रकार. | १) महाविद्यालयीन विद्यार्थी<br>२) ट्रान्सपोर्ट मालक/चालक<br>३) टॅक्सी /ऑटोरिक्षा चालक/मालक |
| २ | २/१/२०१२ | **अ)** १) वाहनांना रिफ्लेक्टर टेप लावणे,<br>२) बैलगांडयांना टेप लावणे.<br>......<br>**ब) विशेष मोहिम**—लेनकटींग, नो—पार्कींग केसेस करणे | स्थानिक मान्यवर, परिवहन विभागाचे अधिकारी तसेच स्थानिक पोलीस विभागाचे प्रमुख | परिवहन विभाग व वाहतुक पोलीस.<br>जड—अवजड वाहनांचे व बैलगाडयांचे चालक/मालक |
| ३ | ३/१/२०१२ | **अ)** १) वाहन चालकाची नेत्र तपासणी<br>२)आरोग्य शिबीर ३)माहितीपत्रके, पुस्तिकेचे वाटप<br>......<br>**ब) विशेष मोहिम**-ओव्हरसिट/सिटबेल्ट केसेस/फॅन्सी नंबर प्लेट केसेस करणे. | स्थानिक मान्यवर तसेच स्थानिक प्राथमिक, जिल्हा आरोग्य केंद्राचे वैदयकीय अधिकारी. | वैद्यकिय अधिकारी, त्यांचा स्टाफ, पोलीस अधिकारी कर्मचारी<br>वाहनांचे चालक |
| ४ | ४/१/२०१२ | **अ)** १) मोटार वाहन चालक प्रबोधन व प्रशिक्षण, चौकसभा, हॉटेल मालकांना पार्कींग व रहदारी नियमाविषयी प्रबोधन,<br>२) स्कुलबस चालकांचे प्रशिक्षण.<br>......<br>**ब) विशेष मोहिम**— अंबरलाईट/लेन कटींग/टेल लाईट. | हॉटेल मालक, वाहतूक संघटनांचे पदाधिकारी. | परिवहन विभाग, महामार्ग पोलीस व स्थानिक पोलीस.<br>हॉटेलचा स्टाफ, वाहन चालक, पार्कींगमध्ये काम करणारा स्टाफ.<br>विदयार्थी वाहतूक करणारे वाहनांचे चालक/मालक |

एच-२३८५ -३अ

| अ.क्र | दिनांक | कार्यक्रम | आंमत्रीत मान्यवर | अंमलबजावणी/सहभाग |
|---|---|---|---|---|
| ५ | ५/१/२०१२ | **अ)** १) शाळा कॉलेजचे विद्यार्थ्यांचे प्रबोधन व सहभाग,<br>२) रस्ता सुरक्षा विषयी वकृत्व, चित्रकला व निबंध स्पर्धा यांचे आयोजन करणे, परिसंवाद, माहिती पत्रकांचे वाटप.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम -** हेल्मेट बाबत केसेस करणे/लेनकटींग/सिटबेल्ट. | शाळा/महाविदयालयांचे प्राचार्य व शिक्षक. | शिक्षण विभागाचे स्थानिक अधिकारी, परिवहन विभागाचे अधिकारी, पोलीस अधिकारी. शाळा कॉलेज विद्यार्थी व शिक्षक. |
| ६ | ६/१/२०१२ | **अ)** १) वाहन चालक व पोलीस कर्मचारी, वाहतुक पोलीस यांचेकरीता धोकादायक रसायन हाताळणी संबंधी प्रात्यक्षिक व प्रशिक्षण.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम-**मोबाईल फोनचा वापर/ड्रंकनड्राईव्ह/ओव्हरस्पीड केसेस करणे. | ओ.एन.जी.सी/भारत पेट्रोलियम व केमिकल कंपनीचे प्रतिनिधी, प्रशिक्षक. | परिवहन विभागाचे अधिकारी, पोलीस अधिकारी/कर्मचारी.<br><br>धोकादायक रसायन वाहुन नेणाऱ्या वाहनांचे चालक/मालक |
| ७ | ७/१/२०१२ | **अ)** १) टोलनाक्यावर माहिती पत्रक/पुस्तीकेचे वाटप/सिनेमा केबलवर स्लाईड शो दाखवणे.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम-**टेललाईट/ओव्हरलोडिंग केसेस. | तहसिलदार, परिवहन अधिकारी, स्थानिक केबल ऑपरेटर | तहसिलदार, परिवहन अधिकारी, महामार्ग पोलीस जिल्हा व शहर वाहतुक पोलीस<br>स्थानिक नागरिक व वाहनांचे चालक/मालक. |
| ८ | ८/१/२०१२ | अ) १) सार्वजनिक बांधकाम विभागासोबत ब्लॅकस्पॉटची दुरूस्ती करणे,फलक लावणे, धोकादायक इशाऱ्याचे फलक लावणे, रस्त्यावर पट्टे मारणे, तुटलेले,दुभाजक दुरूस्ती करणे.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम-**रेड/येलो अंबर लाईट, सीटबेल्ट केसेस मोहिम करणे. | सार्वजनिक बांधकाम विभाग एमएसआरडीसी बांधकाम कंपनी | सार्वजनिक बांधकाम विभाग महामार्ग जिल्हा वाहतुक पोलीस एमएसआरडीसी बांधकाम कंपनी |
| ९ | ९/१/२०१२ | **अ)** १) टिव्ही चॅनेल, रेडिओ, दुरचित्रवाणी आकाशवाणी व इतर चॅनेलवर परिसवांद कार्यक्रम यांचेत सहभाग व चर्चा तसेच सिनेमा टॉकीजमध्ये फिल्म दाखविणे स्लाईड शो दाखविणे.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम-**अवैध प्रवासी वाहतुक, नो–पार्कीग केसेस करणे. | परिवहन, आरोग्य विभाग, पोलीस, सा.बां.वि. | परिवहन, आरोग्य विभाग, पोलीस, सा.बां.वि.चे अधिकारी व टिव्ही चॅनेल आकाशवाणी व पत्रकार. |
| १० | १०/१/२०१२ | **अ)** १) आर.एस.पी रॅली ऑडिओ, व्हीडिओ, प्रदर्शन,<br>२) विद्यार्थ्यांना वाहतुक नियमांची माहिती व प्रशिक्षण.<br>..........<br>**ब) विशेष मोहिम-**ड्रंकनड्राईव्ह; सीटबेल्ट मोहिम आयोजित करणे. | जिल्हा/तालुका शिक्षण विभागाचे अधिकारी. शाळा/महाविदयालयाचे शिक्षक वृन्द. | शिक्षण विभागाचे अधिकारी, वाहतुक पोलीस अधिकारी शाळा,कॉलेज विद्यार्थी. |

| अ.क्र | दिनांक | कार्यक्रम | आंमत्रीत मान्यवर | अंमलवजावणी/सहभाग |
|---|---|---|---|---|
| ११ | ११/१/२०१२ | **अ)** १) चौकाचौकात झेब्राक्रासिंग पादचारी व जनतेला माहिती देणे, चौकात बोर्ड लावणे.<br>**ब) विशेष मोहिम-**ओव्हरस्पिडीग, फॅन्सी नंबरप्लेट केसेस मोहिम. | महानगर/नगर पालिकेचे अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग | महानगर/नगर पालिकेचे अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, पोलीस अधिकारी /कर्मचारी<br>**स्थानिक नागरिक.** |
| १२ | १२/१/२०१२ | **अ)** १)पत्रकेवाटप २)चालकांची जनजागृती<br>**ब) विशेष मोहिम-**ड्रंकनड्राईव्ह, लेनकटींग, ओव्हरस्पिडींग, मोहिम राबविणे, अवैध प्रवासी वाहतुकीची कारवाई करणे. | परिवहन विभाग | परिवहन विभाग व महामार्ग पोलीस, स्थानिक पोलीस<br>**वाहनांचे चालक/मालक व स्थानिक नागरिक.** |
| १३ | १३/१/२०१२ | **अ)** १) वाहन चालक, पोलीस व वाहतुक कर्मचारी यांना प्रथमोपचार प्रशिक्षण देणे.<br>**ब) विशेष मोहिम-**लेनकटींग, सीटबेल्ट केसेस मोहिम. | जिल्हा शल्य चकीत्सक, खाजगी डॉक्टर, आरोग्य विभागाचे अधिकारी. | जिल्हा शल्य चकीत्सक, खाजगी डॉक्टर, आरोग्य विभागाचे अधिकारी.<br>**पोलीस अधिकारी/कर्मचारी व वाहनांचे चालक/मालक** |
| १४ | १४/१/२०१२ | **अ)** १) रस्ता सुरक्षा अभियान संबंधी सेमिनार<br>**ब) विशेष मोहिम-**ड्रंकनड्राईव्ह, रिफ्लेक्टर मोहिम आयोजित करणे. | मा. मंत्री/आमदार /मान्यवर परिवहन विभाग, एसटी संघटनेचे प्रतिनिधी, आरोग्य /सा.बां. विभागाचे अधिकारी, केमिकल कंपनीचे प्रतिनिधी | परिवहन विभाग,एसटी संघटनेचे प्रतिनिधी, आरोग्य विभाग, परिवहन खाते, रिक्षा युनियन, ट्रान्सपोर्ट संघटना, एसटी संघटना, भारत पेट्रोलियन विभागातील प्रतिनिधी, वैद्यकिय संघटनेचे प्रतिनिधी. |
| १५ | १५/१/२०१२ | **अ)** १) समारोप समारभं वाहन चालक, पोलीस कर्मचारी यांची एन. जी.ओ. च्या हस्ते प्रबोधन करणे, होर्डिंग लावणे, पत्रकाचे वाटप करणे,<br>**ब) विशेष मोहिम-**फॅन्सी नंबरप्लेट, नो--पार्कींग केसेस मोहिम व अभियान समारोप. | मंत्री/आमदार /मान्यवर विद्यापीठ कूलगुरू | जिल्हयातील पोलीस प्रमुख, महामार्ग पोलीस प्रमुख, इतर मान्यवर.<br>**शाळा/महाविदयालयाचे एनएसएस, एनसीसी विदयार्थी** |

---------